**कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदलीमध्ये अंशत: बदल करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः एलटीएस ११२३/प्र.क्र. २३८/२०२३/आ (वर्ग-१)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक : ०९ ऑगस्ट, २०२३.

**संदर्भ :** शासन आदेश, जलसंपदा विभाग, क्रमांक- एलटीएस ११२३/प्र.क्र. २४/२०२३/आ(वर्ग-१), दिनांक ३०.०६.२०२३.

**शासन आदेश :**

उपरोक्त संदर्भाधीन दिनांक ३०.०६.२०२३ च्या आदेशान्वये कार्यकारी अभियंता (स्थापत्य) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या सन २०२३ मधील सार्वत्रिक बदल्यांबाबतचे आदेश निर्गमित करण्यात आले आहेत. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने प्रशासकीय कारणास्तव खालील अधिकाऱ्याच्या पदस्थापनेमध्ये सुधारणा करण्यात येत आहे :-

| अ.क्र . | अधिकाऱ्याचे नांव | बदलीने पदस्थापने पूर्वीचे पद | दिनांक ३०.०६.२०२३ च्या आदेशानुसार बदलीने दर्शविण्यात आलेले पद | सुधारित पदस्थापना |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.प्रविण युवराज झोड | कार्यकारी अभियंता, पेंच पाटबंधारे विभाग, नागपूर (सिंचन) | कार्यकारी अभियंता, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर | **विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळांतर्गत कार्यकारी अभियंता, लघु पाटबंधारे विभाग, चंद्रपूर.** |

२. श्री.झोड यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदी अन्य अधिकाऱ्याच्या नियुक्तीबाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. संबंधित मुख्य अभियंता यांना कळविण्यात येते की, श्री.प्र.यु. झोड यांना बदलीच्या पदावर रुजू होण्यासाठी तात्काळ कार्यमुक्त करावे व त्यांच्या बदलीमुळे रिक्त झालेल्या पदाचा अतिरिक्त कार्यभार कार्यकारी संचालक यांच्या संमतीने पुढील आदेश होईपर्यंत स्थानिक व्यवस्था करुन अन्य अधिकाऱ्याकडे सोपविण्यात यावा.

४. संबंधीत अधिकाऱ्यास नवीन नियुक्तीच्या जागी हजर होण्यासाठी कोणत्या दिनांकास कार्यमुक्त केले आणि ते नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doesttclass१.wrd@maharashtra.gov.in या ई-मेल संकेतस्थळावर त्वरित कळवावे.

५.     संबंधीत अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करु नये. तसेच म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्याचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास, ते संबंधीत अधिकाऱ्यास मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत. मूळ कार्यालयाकडे बदली झालेल्या अधिकाऱ्याचे रजेचे अर्ज पाठविल्यास सदर अर्जांची दखल घेण्यात येणार नाही.

६.     सदरहू बदली आदेशानुसार तात्काळ नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ मधील नियम २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

७.     सदर शासन आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२३०८०९१४०४२६७४२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे. तसेच सदर शासन आदेश जलसंपदा विभागाच्या https://wrd.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAKHI SACHIN CHAVAN

Digitally signed by RAKHI SACHIN CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=7206b9312f3f73ff523e7a493d6d53d819f5c15336ff9a16ada11a287b879985, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=75AA5A95E2FE606BB64628D64D984EA9D651466BF93A6A2C44EEC93DF9207974, cn=RAKHI SACHIN CHAVAN
Date: 2023.08.09 14:05:32 +05'30'

**( राखी चव्हाण )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.   मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२.   मा.उप मुख्यमंत्री (जलसंपदा) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३.   अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
४.   सचिव ( लाक्षेवि) / सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
५.   कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामहामंडळ, जलसंपदा विभाग, नागपूर.
६.   मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर.
७.   महालेखापाल, महाराष्ट्र (लेखा व अनुज्ञेयता), १- मुंबई/ २- नागपूर.
८.   संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
९.   संबंधीत अधिकारी.
१०.  सर्व कार्यासने, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई .
११.  कार्यासन आ (वर्ग-१), संग्रहार्थ.